


**विभागाच्या अधिनस्त क्षेत्रीय कार्यालयात सहायक संचालक, इ.मा.ब.क., पुणे या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती व पदस्थापना श्री. प्रदिप भा. संकपाळ, सहायक वन संरक्षक**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्र. आस्थाप्र २०२५ / प्र. क्र. ८७ / आस्था २**
मंत्रालय विस्तार, पहिला मजला,
मंत्रालय, मुंबई ३२
दिनांकः- ३० मे, २०२५

**संदर्भः**
१) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. एसआरव्ही - २०११ / प्र. क्र. १३७ / कार्यासन १२, दि. १७/१२/२०१६
२) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. एसआरव्ही - २०१६ / प्र. क्र. ५१० / कार्या.१२, दि. १६ फेब्रुवारी, २०१८
३) इतर मागास बहुजन कल्याण विभाग शासन निर्णय क्र. आस्थाप्र - २०१७ / प्र. क्र. ०८ / आस्थापना - २, दि. १४ जानेवारी, २०२१ आणि दि. २२ मार्च, २०२२
४) श्री. प्रदिप भा. संकपाळ, सहायक वन संरक्षक यांचा दि.१७/०१/२०२५ चा अर्ज
५) महसूल व वन विभागाचे पत्र क्र. एमएफएस-०४.२५ / प्र. क्र. ६७ / फ-८, दि. २२ मे, २०२५

**शासन निर्णयः-**

सामान्य प्रशासन विभागाच्या दि. ०९ मार्च, २०१७ च्या अधिसूचनेन्वये सामाजिक न्याय व विशेष साहाय्य विभागातून इतर मागास बहुजन कल्याण या नवीन विभागाची निर्मिती करण्यात आली. सदर नवनिर्मित विभागाच्या क्षेत्रीय कार्यालयांसाठी इतर मागास बहुजन कल्याण संचालनालयाच्या आस्थापनेवर ८२१ पदांच्या सुधारित आकृतीबंधास शासनाच्या उच्चस्तरीय समितीच्या मान्यतेने संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयांन्वये मंजुरी देण्यात आली आहे. विभागाच्या क्षेत्रीय कार्यालयातील उक्तपणे मान्य आकृतीबंधातील संवर्गनिहाय मंजूर पदांवर पदभरतीच्या अनुषंगाने सेवाभरती नियम तयार करणे, तद्नंतर पदभरतीसाठी जाहिरात देवून महाराष्ट्र लोकसेवा आयोग व विभागातील निवड समितीमार्फत भरती प्रक्रिया राबविणे यासाठी काही कालावधी लागणार असल्याने नियमानुसार नियमित पदभरती होईपर्यंच्या कालावधीत समकक्ष वेतनश्रेणीतील पदांवर इच्छुकता मागवून प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्याबाबतची कार्यवाही या विभागामध्ये सुरू आहे. त्या अनुषंगाने संदर्भ क्र. ४ येथील अर्जान्वये श्री. प्रदिप भा. संकपाळ, सहायक वन संरक्षक यांनी विभागाच्या अधिनस्त पुणे येथील कार्यालयात सहायक संचालक या रिक्त पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती मिळण्याबाबत विनंती केली.

२.	महसूल व वन विभागाने त्यांच्या संदर्भ क्रमांक ५ येथील पत्रान्वये श्री. प्रदिप भा. संकपाळ, सहायक वन संरक्षक यांची सेवा विषयक माहिती, गोपनीय अहवाल, प्रतिनियुक्तीने नियुक्तीस सहमती व ना-हरकत इत्यादी माहिती विभागास सादर केली आहे. त्यामध्ये श्री. प्रदिप भा. संकपाळ, सहायक वन संरक्षक यांची वेतनश्रेणी एस-१८, (₹४९,१०० - ₹१५५,८००) अशी असल्याचे नमूद केले आहे.

३.	संदर्भ क्रमांक १ व २ येथील शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, अन्वये राज्य शासकीय कर्मचाऱ्यांच्या प्रतिनियुक्तीने नियुक्तीबाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. सदर सूचनांच्या अधीन राहून सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने श्री. प्रदिप भा. संकपाळ, सहायक वन संरक्षक यांची इतर मागास बहुजन कल्याण विभागाच्या अधिनस्त सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, पुणे या रिक्त पदावर पुढील अटी / शर्तीच्या अधीन राहून प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यास मान्यता देण्यात येत आहेः-

१) श्री. प्रदिप भा. संकपाळ, सहायक वन संरक्षक यांची उक्त पदावरील प्रतिनियुक्ती ते ज्या दिवशी सदर पदावर रूजू होतील त्या दिवसापासून, प्रथमतः तीन वर्षांच्या कालावधीसाठी किंवा सदर पदावर नियमित अधिकारी उपलब्ध होईपर्यंत किवा विभागाच्या पुढील आदेशापर्यंत, यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत असेल.
२) श्री. प्रदिप भा. संकपाळ, सहायक वन संरक्षक यांच्या प्रतिनियुक्तीच्या कालावधीत आवश्यकतेनुसार महसूल व वन विभागाच्या सहमतीने वाढ करता येईल.
३) जर श्री. प्रदिप भा. संकपाळ, सहायक वन संरक्षक यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने मूळ प्राधिकाऱ्यास आवश्यक वाटली तर, प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना त्यांच्या मूळ कार्यालयाकडे परत पाठविण्याचा अधिकार शासनास राहील.
४) श्री. प्रदिप भा. संकपाळ, सहायक वन संरक्षक यांची सेवा प्रतिनियुक्तीच्या कार्यालयास आवश्यक नसल्यास त्यांच्या सेवा मूळ विभागास परत करण्याची मुभा प्रतिनियुक्तीच्या कार्यालयास राहील.
५) श्री. प्रदिप भा. संकपाळ, सहायक वन संरक्षक यांनी जर आपल्या मूळ विभागाकडे परत जाण्याचा उद्देश आहे, अशी किमान ३ महिन्याची लेखी पूर्वसूचना सक्षम प्राधिकाऱ्यास /शासनास दिली तर त्यांना आपल्या मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.
६) श्री. प्रदिप भा. संकपाळ, सहायक वन संरक्षक यांना उपरोक्त प्रतिनियुक्तीच्या कालावधीत प्रतिनियुक्ती भत्ता अनुज्ञेय असणार नाही.
७) उपरोक्त प्रतिनियुक्तीच्या कालावधीत श्री. प्रदिप भा. संकपाळ, सहायक वन संरक्षक यांना अनुज्ञेय असलेल्या रजा, गट विमा योजना, वैद्यकीय सवलत, रजा प्रवास सवलत इत्यादी सेवाविषयक बाबींच्या संदर्भात त्यांना त्यांच्या मूळ विभागातील सेवाविषयक नियम लागू असतील.

८) उपरोक्त प्रतिनियुक्ती संदर्भातील अटी / शर्ती व अनुषंगिक प्रशासकीय बाबी इतर मागास बहुजन कल्याण विभाग आणि महसूल व वन विभाग यांच्यात विचारविनिमय करून ठरविण्यात येतील.

४. श्री. प्रदिप भा. संकपाळ, सहायक वन संरक्षक यांनी प्रतिनियुक्तीचे प्रस्तुत आदेश प्राप्त झाल्यानंतर तात्काळ प्रतिनियुक्तीच्या कार्यालयात रूजू व्हावे, त्यासाठी त्यांना पदग्रहण अवधी, प्रवास खर्च इत्यादी अनुज्ञेय असणार नाही.

५. सदर आदेश महसूल व वन विभागाने त्यांच्या संदर्भाधीन क्र. ५ येथील दि. २२.०५.२०२५ च्या पत्रान्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०५३०१८०८००८१३४ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

KAILAS TARACHAND SALUNKE

Digitally signed by KAILAS TARACHAND SALUNKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=2251a03d4696f35feb94e0a8547536fa68882bdecaaba93cee29502d225f6286, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=35C845457FD4B891124529DBD2192A0E21273AD7339A5CA3B170A0E91352CED7, cn=KAILAS TARACHAND SALUNKE
Date: 2025.05.30 18:08:54 +05'30'

**(कैलास साळुंके)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री. प्रदिप भा. संकपाळ, सहायक वन संरक्षक, (रोहयो व कॅम्पा) कन्नड वन विभाग, छ. संभाजी नगर, वन भवन, एस.एस.सी बोर्ड समोर, रेल्वे स्टेशन, उस्मानपुरा, छ. संभाजीनगर

**प्रत,**

१. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे
२. अवर सचिव, (वने/ फ-८), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
३. आयुक्त (सामाजिक न्याय), समाज कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
४. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
५. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा)- १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
६. जिल्हा कोषागार अधिकारी, छ. संभाजीनगर /पुणे
७. मा. मंत्री ( इ.मा.ब.क. ) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव ( इ.मा.ब.क.) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
९. निवडनस्ती.